**डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ व्या जयंती वर्षानिमित्त मौजे काळकाई कोंड, ता. दापोली जि. रत्नागिरी येथील ऐतिहासिक स्थळाचा विकास करणेकरीता निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सान्यावि-२०१८/ प्र.क्र.३४३/ बांधकामे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०१ डिसेंबर, २०१८.

वाचा :- १) शासन निर्णय क्र. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.सान्यावि-२०१५/ प्र.क्र.१६३/ बांधकामे, दि.९/१०/२०१५
२) शासन निर्णय क्र. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग बैठक-२०१६/ प्र.क्र.४७५/ बांधकामे, दि.२४/३/२०१७
३) आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांचे पत्र क्र.सकआ/मावक/मौआं/ ऐति.स्थळ/२०१७-१८/ का-१२/ ८५६, दि.२२/१०/२०१८.

**प्रस्तावना :-**

भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त अनुसूचित जाती व नवबौध्द घटकासाठी ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्टया महत्व असलेल्या स्थळांचा विकास करणे या अंतर्गत संदर्भ क्र.१ अन्वये मा.मंत्री (सा.न्या.वि.स.) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीच्या दि.१/८/२०१६ रोजी झालेल्या बैठकीच्या इतिवृत्तासोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये अनुसूचित जाती नवबौध्द घटकासाठी ऐतिहासिक व सांस्कृतीकदृष्टया महत्व असलेल्या एकूण २८ ठिकाणे/स्थळांची यादी अंतिम करण्यात आली असून त्यामध्ये मौजे काळकाई कोंड, ता. दापोली जि. रत्नागिरी येथील ऐतिहासिक स्थळाच्या विकासाकरीता रु.५०.०० लक्ष निधी मंजूरीबाबत संदर्भीय क्र.२ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यास अनुसरुन संदर्भ क्र. ३ अन्वये आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांच्यामार्फत मौजे काळकाई कोंड, ता. दापोली जि. रत्नागिरी येथील ऐतिहासिक स्थळाचा विकास करणेकरीता प्राप्त झालेला प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाकडे तांत्रिक छाननीसाठी पाठविला असता सार्वजनिक बांधकाम विभागने परिगणित केलेल्या रु.४९,१९,८४१/- (एकोणपन्नास लक्ष एकोणावीस हजार आठशे एक्केचाळीस फक्त) इतक्या रक्कमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांच्याकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार, भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंतीनिमित्त मौजे काळकाई कोंड, ता. दापोली जि. रत्नागिरी येथील ऐतिहासिक स्थळाचा विकास करण्याकरीता सार्वजनिक बांधकाम विभागने परिगणित केल्यानुसार रु.४९,१९,८४१/- (एकोणपन्नास लक्ष एकोणावीस हजार आठशे एक्केचाळीस फक्त) इतक्या रकमेस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे -:

**अटी व शर्ती:-**

१) सदर काम सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करण्यात यावे.
२) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

३) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

४) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि.१०/१/२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

५) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमारती-२,दि.७/७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

६) सदर कामास प्रत्यक्ष सुरुवात करण्यापुर्वी सविस्तर अंदाजपत्रकास अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम (प्रा.) मंडळ, रत्नागिरी यांच्या कडून तांत्रिक मान्यता घेण्यात यावी.

२. प्रस्तुत कामावरील खर्च हा मागणी क्र.एन-३, २२२५-अनुसूतिच जाती व अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१-अनुसूचित जातीचे कल्याण, ७८९-अनुसूचित जाती घटक योजना, ०२-भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ वी जयंती साजरी करणे (योजनांतर्गत-दत्तमत) लेखाशिर्ष २२२५ डी ८२३ या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे यांच्या अधिनस्त असलेल्या निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

३. या करीता आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत असून, त्यांनी या कामासाठीचा निधी, वित्त विभागाने विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार त्या त्या टप्प्यावर सदरहू कामाकरीता वितरीत करावा.

४. प्रस्तुतचा शासन निर्णय, दि.९/१०/२०१५ च्या शासन निर्णयान्वये गठित समितीस प्राप्त अधिकार तसेच वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच, अनु.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२०११७३६४४६९२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2018.12.01 17:43:42 +05'30'

**( अ.कों.आहिरे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे
३) मा.मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४) मा.राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, रत्नागिरी

६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, रत्नागिरी
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा), महाराष्ट्र१/२, मुंबई/ नागपूर.
८) प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, मुंबई.
९) सहायक आयुक्त, समाजकल्याण, रत्नागिरी.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, पूणे/ रत्नागिरी.
११) निवडनस्ती / बांधकामे.